**तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अखत्यारीतील सॉफ्टवेअर व हार्डवेअरची खरेदी, ई प्रशासन धोरणांची अंमलबजावणी याकरिता प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

शासन निर्णय क्रमांक : खरेदी - २०१४/( प्र.क्र. १६५ /१४ )/तांशि - ३,

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २० ऑक्टोबर, २०१४.

वाचा —

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीओएम - १००१/प्र.क्र१७४/०१/३९, दि.२९.१०.२००१

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मातंसं - नस्ती - २०१०/प्र.क्र.३४/३९, दि.१८.६.२०१०

३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मातंसं - २०११/प्र.क्र.१२५/३९, दि.२३.९.२०११

४. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालयाचे पत्र क्र.११/डिटीई/परवानगी/२०१४-१५/६८६, दि.१३.८.२०१४

प्रस्तावना —

शासकीय कामाकाजाचे संपूर्ण संगणकीकरण करण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील दि.२९.१०.२००१ च्या शासन निर्णयाव्दारे कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहेत. यानुसार ज्या प्रकल्पामध्ये हार्डवेअर काम्पोनंटची खरेदी रु.५.०० लक्ष पेक्षा जास्त व सॉफ्टवेअर काम्पोनंटची खरेदी रु.२.०० लक्ष पेक्षा जास्त असेल असे संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्यासाठी संबंधीत विभागांनी संबंधीत प्रधान सचिव/सचिव यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करणे आवश्यक आहेत. तसेच, संदर्भ क्र. २ येथील दि.१६.६.२०१० च्या शासन निर्णयाव्दारे विभागाच्या एकूण उपलब्ध तरतूदींच्या अर्धा टक्क्यापर्यंत निधी ई-गव्हर्नन्सकरिता राखून ठेवण्यात यावा व हा निधी खर्च करतांना प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता घेण्यात यावी, असे आदेश देण्यात आलेले आहेत. त्याचप्रमाणे संदर्भ क्र. ३ येथील दि.२३.९.२०११ च्या शासन

निर्णयाव्दारे जाहिर करण्यात आलेल्या ई-प्रशासन धोरणानुसार ई-प्रशासन प्रकल्पांवर देखरेख करण्याची जबाबदारी प्रकल्प अंमलबजावणी समितीवर ठेवण्यात आलेली आहे. त्यानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय —**

तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अखत्यातील संगणकीकरणांच्या प्रकल्पाची अंमल बजावणी करण्यासाठी तसेच नागरिक केंद्रीत ई-सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी आणि ई-प्रशासन धोरणांतर्गत सर्व ई-प्रशासन प्रकल्पांवर देखरेख करण्यासाठी खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

१) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग — अध्यक्ष

२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी — सदस्य

३) प्रधान सचिव, वित्त विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी — सदस्य

४) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान अथवा त्यांचे प्रतिनिधी — सदस्य

५) माहिती व तंत्रज्ञान संचालनालयामार्फत जाहिर करण्यात आलेल्या तज्ञ मंडळातील एक तज्ञ —सदस्य

६) उप सचिव (तांशि), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई — सदस्य

७) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई — सदस्य सचिव

३. तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अखत्यारीतील रु.५.०० लक्ष पेक्षा जास्त रक्कमेच्या हार्डवेअर काम्पोनंटच्या व रु.२.०० लाख पेक्षा जास्त रक्कमेच्या सॉफ्टवेअर काम्पोनंटच्या खरेदीचे प्रस्ताव प्रकल्प अंमलबजावणी समिती समोर मान्यतेसाठी ठेवण्यात यावेत. तसेच तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अखत्यारीतील नागरिक केंद्रीत ई-सेवा उपलब्ध करुन देण्यासाठीचे प्रस्ताव आणि ई-प्रशासन धोरणांनुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता आवश्यक असलेले सर्व प्रस्ताव, प्रकल्प अंमल बजावणी समितीसमोर मान्यतेसाठी ठेवण्यात यावेत. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या मान्यतेशिवाय अशा प्रकारची कोणतीही खरेदी करण्यात येऊ नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२०१५०४३०६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHARURKAR SANJAY AUDUMBAR

Digitally signed by DHARURKAR SANJAY AUDUMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=H AND T E,CID - 917065, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DHARURKAR SANJAY AUDUMBAR
Date: 2014.10.21 15:00:43 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई
६. उप सचिव (तांशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. निवड नस्ती/तांशि-३.